**महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग, पुणे यांना विनिर्दिष्ट कामकाजाकरिता बाह्ययंत्रणेद्वारे कंत्राटी तत्वावर कामे करून घेण्यासाठी मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्र. आयोग-२०२२/प्र.क्र.५६/मावक**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०३ मार्च, २०२२

**वाचा -**

१) शासन अधिसूचना, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.आयोग-२०२१/प्र.क्र.१३६/मावक, दि. २९ जून, २०२१.
२) सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांचे पत्र क्र.मरामाआ/लेखा/प्र.क्र.७८/२०२०-२१/३१०, दि. २० जुलै, २०२१
३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोग यांचे पत्र क्र. मरामाआ/लेखा/प्र.क्र.१०३/ २०२०-२१/३४६, दि. २८ जुलै, २०२१.
४) शासन अधिसूचना, इतर मागास बहुजन कल्याण विभाग क्र.आयोग-२०२१/प्र.क्र.१३६/मावक, दि. २७ डिसेंबर, २०२१.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.संकीर्ण-२०२०/प्र.क्र.२४/२०/आ.पु.क, दि.३० सप्टेंबर २०२०.

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने रिट याचिका (सिव्हील) क्र. ९८०/२०१९ मध्ये दि. ०४.०३.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयातील परिच्छेद क्र. १२ विचारात घेवून शासन अधिसूचना दि.२९.०६.२०२१ अन्वये महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास स्थानिक स्वराज्य संस्थामधील आरक्षणाशी संबंधित विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी समर्पित आयोग (Dedicated Commission) म्हणून घोषीत करण्यात आले असून आयोगाची सुधारित कार्यकक्षा (Terms of reference) दि.२७.१२.२०२१ च्या शासन अधिसूचनेन्वये निश्चित करण्यात आलेली आहे. महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने त्यांच्यावर सोपविण्यात आलेली विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी अधिकच्या मनुष्यबळाची मागणी दि.२०.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये तसेच तद्नुषंगाने कार्यालयीन खर्चाकरिता संभाव्य अंदाजपत्रक दि. २८.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेले आहे.

“स्थानिक स्वराज्य संस्थांमधील ओबीसी आरक्षणाबाबत” याविषयी मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.२४/१/२०२२ रोजीच्या बैठकीत महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाचे मुख्य कार्यालयाकरीता अधिकचे ३० मनुष्यबळ देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. तसेच, महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास दि. ०३.०२.२०२२ च्या शासन निर्णयान्वये कार्यालयीन खर्चासह वीज दूरध्वनी तसेच प्रवास खर्चाकरिता एकूण रु. ८४,१८,६८,०००/- इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला आहे. समर्पित आयोगाच्या अनुषंगाने विनिर्दिष्ट कामकाज पार पाडण्यासाठी आयोगास बाहयस्त्रोत यंत्रणेद्वारे अधिकचे मनुष्यबळ कंत्राटी तत्वावर उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगास स्थानिक स्वराज्य संस्थामधील आरक्षणाशी संबंधित विनिर्दिष्ट कामे पार पाडण्यासाठी खालीलप्रमाणे ३० पदे बाहयस्त्रोत यंत्रणेद्वारे कंत्राटी तत्वावर विहित अटीच्या अधिन राहून भरण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | सेवा | मनुष्यबळाची संख्या | मासिक मानधन (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | वरीष्ठ लेखाधिकारी (सेवानिवृत्त) | १ | ६०,००० |
| २ | सहायक लेखाधिकारी (सेवानिवृत्त | १ | ४०,००० |
| ३ | लेखा सहायक | १ | २०,००० |
| ४ | संशोधन अधिकारी (कंत्राटी) | ४ | ३५,००० |
| ५ | उच्चश्रेणी लघुलेखक (कंत्राटी) (उच्च न्यायालयातील सेवानिवृत्त | १ | ५०,००० |
| ६ | निम्नश्रेणी लघुलेखक सेवानिवृत्त | २ | ३०,००० |
| ७ | विधी सल्लागार (कंत्राटी) | १ | ४०,००० |
| ८ | विधी सहायक (कंत्राटी) | १ | ३०,००० |
| ९ | कनिष्ठ सहायक (कंत्राटी) | ७ | २२,००० |
| १० | वरीष्ठ प्रकल्प संचालक माहिती तंत्रज्ञान (कंत्राटी) | १ | १,००,००० |
| ११ | डेटा एन्ट्री ऑपरेटर (कंत्राटी) | २ | १८,००० |
| १२ | संगणक कनिष्ठ सल्लागार | २ | २५,००० |
| १३ | शिपाई (कंत्राटी) | ४ | १५,००० |
| १४ | वाहन चालक (कंत्राटी) | २ | २०,००० |
| **एकूण** | | ३० | ५,०५,००० |

२. सदर ३० कंत्राटी पदांना ११ महिन्याच्या (कमाल कालावधी) सेवेसाठी येणाऱ्या रु. २,४२,४४,०००/- (अक्षरी: दोन कोटी बेचाळीस लाख चौव्वेचाळीस हजार रुपये फक्त) खर्चास सहमती देण्यात येत आहे.

३. सदर कंत्राटी पदे एकूण ११ महिने किंवा प्रत्यक्ष कामकाजाचा कालावधी, यापैकी जो कालावधी कमी आहे, इतक्या कालावधीकरिता कार्यरत राहतील.

४. सदर पदांवर होणारा खर्च खालील लेखाशिर्षागर्गात भागविण्यात यावा.

मागणी क्र: -झेड जी-०३

लेखाशिर्ष :- २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण,

०३, मागावर्गीयाचे कल्याण

००१, संचालन व प्रशासन

(०१)विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग यांचे कल्याण
(०१) (०२) राज्य मागासवर्ग आयोग
(अनिवार्य) (२२२५ एफ ३५२)
१०- कंत्राटी सेवा

५. समर्पित आयोगाच्या विनिर्दिष्ट कामकाजाच्या अनुषंगाने कंत्राटी तत्वावरील सेवा व त्यावर होणारा खर्च याचा लेखाजोगा महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने स्वतंत्ररित्या ठेवावा.

६. महाराष्ट्र राज्य मागासवर्ग आयोगाने बाहय यंत्रणेद्वारे कंत्राटी तत्वावर सेवा उपलब्ध करुन घेताना वित्त विभाग शासन परिपत्रक दि. २७.०९.२०१० ते दि. ३०.०९.२०२० यामधील वेळोवेळी देण्यात आलेल्या तरतुदींचे काटेकोरपणे पालन करावे

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२२०३०३११५३२६७४२२ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth A Zalte

Digitally signed by Siddharth A Zalte
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dc54b49c6f5c903027053476b3a6ef50b46ff44a7e8b820fef7bfdd100c56194, pseudonym=4334586425E30572257A4DC1B0FDB4F8B475B4D3, serialNumber=8EA004AE581D6FF06989D826800FF7528B6FD6418579108C011AE21079E9E0C9, cn=Siddharth A Zalte
Date: 2022.03.03 11:55:46 +05'30'

**(सिद्धार्थ अ. झाल्टे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई.
४) अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
७) संचालक लेखा व कोषागारे संचालनालय, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९) निवासी लेखापरिक्षक अधिकारी, मुंबई.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
११) कार्यासन (व्यय-१४) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती- (मावक).